महाराष्ट्र राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांच्या राखीव प्रभागामधून निवडणूक लढवू इच्छिणा-या अनुसूचित जमातीच्या उमेदवारांचा जातीचा दावा तपासण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
शासन निर्णय क्रमांक :- एसटीसी-१००७/प्र.क्र.१६४/का.१०
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १७ नोव्हेंबर, २००९.

**वाचा :-** (१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र. :-एसटीसी-१००७/सी.आर. १६४/का.१०, दिनांक १४ -०९-२००७.

(२) आदिवासी विकास विभाग, शासन शुध्दीपत्र क्र. :-एसटीसी-१००७/सी.आर.१६४/ का.१०, दिनांक २६ -०२-२००८

(३) नगर विकास विभाग, मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नागरी अधिनियम, १९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करण्याकरिता अधिनियम (सन २००८ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १३) दिनांक २ मे, २००८, व महाराष्ट्र महानगरपालिका व नगरपरिषदा (सुधारणा) अधिनियम, २००८, दिनांक १२ मे, २००८.

(४) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मुंबई ग्रामपंचायत, १९५८ आणि महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यामध्ये आणखी सुधारणा करण्याकरिता अधिनियम (सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-५) दिनांक ९ जानेवारी, २००९

(५) मुंबई ग्रामपंचायत आणि महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती (सुधारणा) अधिनियम २००८, दि. २ मार्च, २००९.

**प्रस्तावना** :- राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांच्या (उदा. महानगरपालिका, नगरपालिका, नगर परिषदा, नगर पंचायती, जिल्हा परिषदा, पंचायत समित्या, ग्राम पंचायती इत्यादी) अनुसूचित जमातीसाठी आरक्षित असलेल्या प्रभागात निवडणूक लढवू इच्छिणा-या अनुसूचित जमातीच्या उमेदवारांना नामांकनासाठी अर्ज सादर करतेवेळी जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्यासंदर्भात आदिवासी विकास विभाग, ग्राम विकास व जलसंधारण विभाग तसेच नगर विकास विभाग आणि राज्य निवडणूक आयोग यांचेकडून वेळोवेळी सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार इच्छुक उमेदवारांनी निवडणूकीचे अर्ज सादर करताना अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समित्यांकडे सादर केलेल्या प्रस्तावाची पोचपावती देणे बंधनकारक होते. निवडून आल्यानंतर वैधता प्रमाणपत्र चार महिन्यांच्या आत सादर करण्याची अट विहित करण्यात आलेली होती. परंतु अशा काही प्रकरणांमध्ये समितीकडून जातीचे प्रमाणपत्र अवैध असल्याचे निर्णय दिलेले असल्याने न्यायालयीन प्रकरणे उद्भवलेली आहेत. तसेच राखीव

प्रभागात पोट निवडणूका घेण्याची बाब उपस्थित झाल्यामुळे शासनाचा कालापव्यय व अनावश्यक खर्च झालेला आहे ही बाब लक्षात आल्याने ग्राम विकास व जलसंधारण विभाग तसेच नगर विकास विभागाने त्यांच्या अधिपत्याखालील स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणूकांमध्ये राखीव प्रभागाकरीता निवडणूक लढवू इच्छिणा-या मागासवर्गीय उमेदवारांकरीता नामांकन अर्ज दाखल करते वेळी वैधता प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य राहील अशा सूचना दिलेल्या आहेत. त्यामुळे स्थानिक स्वराज्य संस्थांच्या अनुसूचित जमाती करिता राखीव प्रभागातून निवडणूकीसाठी नामनिर्देशन दाखल करणा-या उमेदवारांनी अनुसूचित जमातीचे वैधता प्रमाणपत्र सादर करण्याबाबत यापूर्वीचे उपरोक्त दिनांक १४.०९.२००७ व दिनांक २६.०२.२००८ चे आदेश रद्द करुन खालील प्रमाणे सुधारीत आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय** :- महाराष्ट्र राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांच्या (उदा. महानगरपालिका, नगरपालिका, नगर परिषदा, नगर पंचायती, जिल्हा परिषदा, पँचायत समित्या, ग्राम पंचायती इत्यादी) निवडणूकीत अनुसूचित जमाती करिता राखीव प्रभागांकरीता होणा-या निवडणूकींमध्ये निवडणूक लढवू इच्छिणा-या अनुसूचित जमातीच्या उमेदवारांना त्यांनी नामांकन अर्ज सादर करताना जात वैधता प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक करण्यात येत आहे.

२. निवडणूक लढविण्यासाठी इच्छुक अनुसूचित जमातीच्या उमेदवारांनी त्यांच्या जात दावा पडताळणीसाठी विहित नमुन्यातील नमुना अर्जासह आवश्यक ते पुरावे व कागदपत्रे संबंधीत स्थानिक स्वराज्य संस्थेच्या निवडणूकीचा कार्यक्रम घोषित होण्यापूर्वी सहा महिने आधी संबंधित जिल्हयाच्या जिल्हाधिका-यांकडे सादर करावीत. जिल्हाधिका-यांनी वरील अर्ज अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समित्यांच्यावतीने स्विकारुन ते सात दिवसाच्या आत संबंधित अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समितीकडे पाठवावेत.

३. जिल्हाधिकारी यांचेकडून प्राप्त झालेले वरील प्रस्ताव, तपासणी समितीने प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून तीन महिन्याचे आत तपासणी करुन त्याबाबतचा निर्णय जिल्हाधिका-याकडे पाठवावा व उमेदवारास त्याबाबत लेखी कळवावे. ज्या प्रकरणी सखोल तपासणीची आवश्यकता आहे. अशा प्रकरणी सुध्दा संबंधीत समितीने तपासणीबाबतचा निर्णय चार महिन्यांच्या आत ( एक महिन्याच्या वाढीव मुदतीत ) द्यावा.

४. जिल्हाधिकारी हे जिल्हयाचे प्रमुख निवडणूक अधिकारी असल्यामुळे त्यांनी त्यांच्या कार्यकक्षेतील सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणुका व निवडणूकीचा कार्यकाळ यासंदर्भातील आढावा घेऊन भविष्यात होणा-या निवडणूकांबाबत स्थानिक स्वराज्य संस्थांच्या विद्यमान पदाधिका-यांचा कार्यकाळ संपण्याच्या किमान सहा महीने आधी सर्व स्थानिक वृत्तपत्रांत जाहीर सुचनेव्दारे व्यापक प्रसिध्दी दयावी व संबंधीत स्थानिक स्वराज्य संस्थांच्या राखीव प्रभागांतून निवडणूक लढवू इच्छिणा-या अनुसूचित जमातीच्या उमेदवारांनी त्यांच्या जातीचा दावा तपासणीचे प्रस्ताव जाहीर सूचना प्रसिध्द झाल्यापासून जिल्हाधिकारी कार्यालयात विहीत मुदतीत सादर करावेत.

५. जिल्हाधिका-यांनी जातीचा दावा तपासणीचे प्रस्ताव स्विकारताना इच्छूक उमेदवार हा महाराष्ट्र राज्यातील मुळ रहीवाशी आहे याबाबत खात्री करावी. त्यासाठी उमेदवाराचे मुळ अधिवास महाराष्ट्रातील असल्याचे तपासून घ्यावे. अन्य राज्यातून महाराष्ट्र राज्यात स्थलांतरीत झालेल्या अनुसूचित जमातीच्या व्यक्तींना महाराष्ट्र राज्याचे अनुसूचित जमातीचे कोणतेही लाभ अनुज्ञेय नाहीत.

६. वरील सूचना सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निदर्शनास आणून भविष्यातील निवडणूकांबाबत तसेच निवडणूकांच्या कार्यकाळाबाबत आवश्यक ती माहिती जिल्हाधिका-यांना वेळोवेळी उपलब्ध करुन देण्याबाबतची कार्यवाही ग्राम विकास व जलसंधारण विभाग तसेच नगर विकास विभागांनी करावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२००९१११७१४३६३९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( ग. गो. पंचभाई )**
**शासनाचे सह सचिव**

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. मंत्री ( आदिवासी विकास ) यांचे खाजगी सचिव,
मा राज्यमंत्री ( आदिवासी विकास ) यांचे खाजगी सचिव,
अपर मुख्य सचिव (महसूल ) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त (महसूल)
आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नविन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, तिसरा मजला, वर्तकनगर प्रभाग समिती कार्यालय, कोरस कंपनीच्यासमोर, वर्तकनगर, ठाणे (प.)-४००६०६.
सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, आदिवासी विकास भवन, जुना आग्रा रोड, नाशिक.